राज्यातील आदिवासी क्षेत्रातील विद्युतीकरणासाठी लागणाऱ्या पायाभुत सुविधांतर्गत पालघर जिल्ह्यातील जव्हार-४ येथील १३२ केव्ही उपकेंद्र उभारण्यासाठी आदिवासी उपयोजनेंतरर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीत करण्याबाबत. (लेखाशिर्ष २८१५०८९).

महाराष्ट शासन
उद्योग ऊर्जा व कामगार विभाग
शासन निर्णय क्रमांक : आवियो-२०१६/प्र.क्र.१०/ऊर्जा-३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च, २०१७

वाचा -

१. वि.वि.शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २०/०४/२०१६ व ०८/२/२०१७
२. वि.वि. शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि. १०/५/२०१७
३. वि.वि. शासन परिपत्रक क्र. पुरक-२०१६/प्र.क्र.२०१/अर्थसंकल्प-३, दि.४/१/२०१७.
४. शासन निर्णय क्र. आ.वि.व. बीयुडी-२०१६/प्र.क्र.२४/कार्यासन-६, दि.३१ मार्च २०१६.

प्रस्तावना

आदिवासी उपयोजनेअंतर्गत पालघर जिल्ह्यातील जव्हार-४ येथील १३२ केव्ही उपकेंद्र उभारण्यासाठी आदिवासी विकास विभागाने डिसेंबर, २०१६ मध्ये पुरवणी मागणी द्वारे रु.६,६७,४८,०००/- इतका निधी अर्थसंकल्पीत केला होता. त्यापैकी रु५३३.९८ लाख इतका निधी संदर्भांकित क्र.४ अन्वये वितरणासाठी संदर्भांकित उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित यांना रोखीन वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय

महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित यांना पालघर जिल्ह्यातील जव्हार-४ येथील १३२ केव्ही उपकेंद उभारण्यासाठी आदिवासी उपयोजनेअंतर्गत रु.५,३३,९८,०००/- (रुपये पाच कोटी तेहत्तीस लाख अठ्ठयाण्णव हजार फक्त) रोखीन वितरीत करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. या निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधीची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आली आहे त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातर जमा करावी.

३. वरील बाबींचा खर्च मागणी क्र.टी-५, २८०१, वीज पंचवार्षिक योजनांतर्गत योजना ८०/सर्वसाधारण, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१)(०३) महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादित यांना अनुदान (२८०१५०८९)३५- भांडवली मत्ता निर्मितीसाठी सहाय्यक अनुदान व लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ करिता मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदरची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.वि.म.राजुरकर, अवर सचिव व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.भि.य. मंता, उप सचिव, उद्योग, ऊर्जा व

कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना मंजूर झालेली रक्कम रु.५,३३,९८,०००/- (रुपये पाच कोटी तेहत्तीस लाख अठ्ठयाण्णव हजार फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरित करण्याची कार्यवाही करावी.

५. दि.२० एप्रिल २०१६ च्या परिपत्रकान्वये, अर्थसंकल्प अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी या परिपत्रका सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या बाबींसाठी तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची तसेच परिच्छेद क्र.७ ते १८ मधील प्रत्यक अटीची व परिशिष्टातील अनु.क्र.३ व६ मधील अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

६. तसेच वित्त विभागाच्या दि.८/२/२०१७ च्या परिपत्रकात नमूद केलेल्या परिच्छेद क्र.२ ते ६ मधील प्रत्येक अटीची पूर्तता झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. तसेच दि.२३/३/२०१७ व आदिवासी विकास विभागाने दि.३१/३/२०१७ च्या शासन निर्णयान्वये व सदर परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार प्रशासकीय विभागास देण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन विभागाच्या अधिकारात सदर निधी वितरीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१७०३३१२११३०८०४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Mahadeorao Rajurkar

Digitally signed by Vilas Mahadeorao Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry, Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=83469494bac86099a320f3e14bf8421ee9d2b48e344470b76ea2595df04951b4, serialNumber=02c5c00269dd48836be0d9939bdff848a9ff1f1a9fd195baf3a104d09b0817d9, cn=Vilas Mahadeorao Rajurkar
Date: 2017.04.01 01:47:24 +05'30'

**(वि.म.राजुरकर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत :-**

१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित, प्रकाशगंगा, बांद्रा (पूर्व),मुंबई-५१
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज मंडळ सुत्रधारी कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४००० २०.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
७. अधिदान व लेखा अधिकारी, (अराप/रालेवि-१) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
९. नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई ४००० ०३२.
१०. अवर सचिव (रोख), उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४००० ०३२.
११. क.अ. (प्रशासन-१), उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४००० ०३२.
१२. वित्त विभाग/(अर्थसंकल्प-१३/साधनसंपत्ती/साऊ/व्य-१६) मंत्रालय, मुंबई-३२
१३. निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४००० ०३२.
१४. अवर सचिव,आदिवासी विकास विभाग, , मंत्रालय, मुंबई ४००० ०३२.